**IIT, Mumbai यांजमार्फत "HEalth risks of heAT Waves in informal settlements in Maharashtra : Informing policy and practice through Scientific Evidence and simulation modelling (HEAT WISE) संशोधन प्रस्तावास रू.४,९०,२९,३५४/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**( आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुर्नवसन )**
**शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२५/प्र.क्र.८१/आव्यप्र-२**
पहिला मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक :- २२ मे, २०२५

**वाचा :-**

१) आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५
२) राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, नवी दिल्ली यांच्या दि.६ मार्च, २०२३ च्या मार्गदर्शक सूचना
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.आव्यप्र-२०२४/प्र.क्र.१/आव्यप्र-२, दि.१० जानेवारी, २०२४.
४) तांत्रिक मूल्यमापन समितीच्या (TAC) दि.१७ फेब्रुवारी, २०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) राज्य कार्यकारी समितीच्या (SEC) दि.२५ मार्च, २०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :**

१५ व्या वित्त आयोगाने महाराष्ट्र राज्यासाठी राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी (State Disaster Mitigation Fund) अंतर्गत केंद्राने व राज्याने निश्चित केलेल्या आपत्तींचे सौम्यीकरण करण्यासाठी सन २०२१-२२ ते सन २०२५-२६ या ५ वर्षाकरीता निधी मंजूर केलेला आहे. सदर निधीच्या वापराबाबत आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रिय गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी दि. १४ जानेवारी २०२२ रोजी व राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (NDMA), नवी दिल्ली यांनी दि. ०६ मार्च २०२३ रोजी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

२. NDMA ने आपत्तीच्या सौम्यीकरणासाठी उपलब्ध करून दिलेल्या निधीपैकी ५% निधी आपत्ती सौम्यीकरणाच्या दृष्टीने होणारे संशोधन व विकास (Research and Development) करण्यास राखीव ठेवला आहे.

३. उष्मा - संबंधित आजार (HRIs) निसर्गात नगण्य स्वरूपाचे वाटत असले तरी जागतिक स्तरावर सार्वजनिक आरोग्याच्या दृष्टीकोनातून ते गंभीर चिंताजनक आहेत. राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, भारत सरकार यांच्या आकडेवारीनुसार सन १९९२ ते २०१५ या कालावधीत उष्णतेच्या लाटेमुळे २४,२३३ मृत्यू झालेले आहेत. मृत्यूच्या व्यतिरिक्त, हे विविध प्रकारच्या सहरोगास कारणीभूत ठरतात.

राष्ट्रीय मार्गदर्शक तत्त्वे उष्णतेच्या लाटाचे निराकरण व उष्णता कृती योजना (HAPS) विकसित करण्यासाठी मार्गदर्शन करतात. तथापि, स्थानिक जोखमीच्या पद्धती आणि पुराव्यावर आधारित स्थानिक संदर्भीकरणाचे आव्हान कायम आहे. देशातील शहर, जिल्हा आणि राज्य स्तरावरील ३७ HAPs ने उष्मा धोक्याचे अतिसरल दृश्य प्रदान केले आहे परंतू वेगवेगळ्या स्थानिक संदर्भांची माहिती देण्यात आलेली नाही.

या पार्श्वभूमीवर, उपरोक्त नमूद असुरक्षित घटकांवर उष्णतेच्या लाटांचे आरोग्यावर होणारे दुष्परिणाम, जलद गतीने वाढ होणा-या लोकसंख्येस अपु-या पडणा-या पायाभूत सुविधा तसेच हवामानातील फरक आणि उष्णतेचा प्रभाव याबाबत संशोधन व संग्रहित माहितीद्वारे स्थानिक प्राधिकरणांना माहितीपूर्ण निर्णय घेण्यास सक्षम करणे आणि धोरण तयार करणे आवश्यक आहे. राज्यातील विविध (शहरी आणि ग्रामीण; किनारपट्टी आणि अंतर्देशीय; डोंगराळ आणि भूभाग) रहिवासी, वयस्क, गरोदर महिला, घराबाहेरील कामगार आणि आजारी असलेल्या व्यक्तींसारख्या असुरक्षित उष्ण लहरींचा आरोग्यावर होणारा प्रतिकूल परिणाम, त्याबाबतची वैज्ञानिक पुरावे/ माहिती संग्रहित करणे, जागरूकता, व्यवस्थापन, धोरण व उपाययोजना तयार करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

IIT, Mumbai यांजमार्फत “**HE**alth risks of he**AT** **W**aves in informal settlements in Maharashtra : **I**nforming policy and practice through **S**cientific **E**vidence and simulation modelling (HEAT WISE)” संशोधन प्रस्तावास रू.४,९०,२९,३५४/- (रुपये चार कोटी नव्वद लक्ष एकोणतीस हजार तीनशे चोपन्न रुपये फक्त ) इतक्या किंमतीच्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या संशोधनामध्ये राज्यातील भिन्न प्रकारच्या भौगोलिक भागामध्ये जसे किनारपट्टी, डोंगराळ आणि मैदानी २४ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीचे सलग दोन उष्णता कालावधीचे संशोधन करण्यात येईल. या प्रकल्पाबाबत संशोधन करताना मानवी नमुन्यांचे संकलन व अन्य प्रक्रिया करतेवेळी भारतीय वैद्यकीय संशोधन परिषद यांजमार्फत निर्गमित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्त्वांचे पालन करण्यात यावे. या संशोधनादरम्यान सार्वजनिक आरोग्य विभाग तसेच वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागांचे सहकार्य घेण्यात यावे.

३. या बाबीवर होणारा खर्च मागणी सी-६, प्रधान शीर्ष २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०७ आपत्ती व्यवस्थापन, १०१, आपत्ती सौम्यीकरण (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१)(०१) राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५ ४२३२), ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या आर्थिक वर्षासाठी मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय तांत्रिक सल्लागार समिती व राज्य कार्यकारी समितीने केलेली शिफारस/ मान्यता व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग - पहिला, उप विभाग - तीन, अ.क्र.४, परिच्छेद क्र.२७(२) मधील तरतूदी व राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची मान्यता घेण्याच्या अटीअधीन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२५०५२२१४५११०७४१९ असा आहे. हे शुद्धिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NITIN NAMDEV MASALE

Digitally signed by NITIN NAMDEV MASALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=71bf640462ffa6d9855e477fe0580ef7d9c0e662ef31f5dca9f38d649ae07df1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=94f59ba1b4fd0c7cc60df5a0032690718fe559bfeb1814fc4939c3561c6c3ac0, cn=NITIN NAMDEV MASALE
Date: 2025.05.22 14:52:26 +05'30'

**( नितीन मसळे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत माहितीस्तव,**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य तथा अध्यक्ष, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
४) मा. मंत्री (महसूल) तथा सदस्य, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
५) मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य विभाग) तथा सदस्य, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
६) मा. मंत्री (आपत्ती व्यवस्थापन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
७) अशासकीय सदस्य ( राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण ) (सर्व)
८) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१०) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१२) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग/ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१३) संचालक (आपत्ती व्यवस्थापन प्रभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१४) वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, (आ. व्य., मदत व पुनर्वसन विभाग), मंत्रालय,

१५) IIT, Mumbai, पवई, मुंबई - ४०००७६.

१६) निवड नस्ती ( आव्यप्र-२)